शासकीय आदिवासी मुला-मुलींच्या वसतिगृह
कामकाजाची सुधारित नियमावली.

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्र. आवप्र-१२०४/प्र.क्र.५२/का.१२
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३ ऑगस्ट, २००४.

वाचा :- १) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.बीसीएस-१३८४/२६३२७/का.१२, दिनांक ११ जुलै, १९८५

२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.बीसीएस-१८८६/१३३९५/प्र.क्र.२४३/का.१२, दिनांक २९ जुलै, १९८८

३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.बीसीएच-१०९१/३५७६९/प्र.क्र.१८५/का.१२, दिनांक २ एप्रिल, १९९२

४) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.१२९७/प्र.क्र.१/का.१२, दिनांक २४ फेब्रुवारी, २०००

५) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.आवगृ-१२०२/ प्र.क्र.५१/ (२००२)/ का.१२, दिनांक २७ डिसेंबर, २००२

६) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.आवगृ-१२०३/प्र.क्र.४० अ/ का.१२, दिनांक १२ सप्टेंबर, २००३

७) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.आवगृ-१२०३/प्र.क्र.६८/का.१२, दिनांक १ ऑक्टोबर, २००३.

८) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र.आवगृ-२००२/ प्र.क्र.७९/ का.६ (४), दिनांक १५ मार्च, २००४.

प्रस्तावना :- राज्यातील अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांच्या माध्यमिक, उच्च माध्यमिक व उच्च महाविद्यालयीन शैक्षणिक विकासाकरिता शासनाकडून चालविल्या जात असलेल्या शासकीय आदिवासी वसतिगृहातील विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या सुविधा व प्रवेश नियमावलीबाबतचे धोरण अ.क्र.१ येथील दिनांक ११.७.१९८५ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे. तर अ.क्र.२ ते ७ येथे नमूद केलेल्या शासन निर्णयान्वये वरील धोरणात वेळोवेळी सुधारणा करण्यात आलेल्या आहेत. तथापि, माध्यमिक, उच्च माध्यमिक व उच्च महाविद्यालयीन शिक्षण देण्याच्या संदर्भात अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांमध्ये सातत्याने होत असलेली वाढ तसेच विद्यमान



MR-NO-200508311054260001-2100

वसतिगृहातील विद्यार्थ्यांची मर्यादीत क्षमता यामुळे विद्यार्थ्यांच्या प्रवेशाबाबत शासनाकडे तक्रारी प्राप्त झालेल्या आहेत. आदिवासी वसतिगृहातील विद्यार्थ्यांच्या प्रवेशासंदर्भात तक्रारीना वाव राहू नये, सर्व आदिवासी विद्यार्थ्यांना समान न्याय मिळावा यासाठी प्रवेशाच्या संदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशांचे अवलोकन करुन वसतिगृह विद्यार्थी प्रवेश प्रक्रिया सुलभ करण्याची तसेच त्यामध्ये वसतिगृह प्रवेशाबाबत सुधारित नियम ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

शासन निर्णय :- शासकीय आदिवासी वसतिगृहातील विद्यार्थी प्रवेशाबाबत शासनाने पुढीलप्रमाणे सुधारित मार्गदर्शक तत्वे विहित करण्याचा निर्णय घेतला आहे. त्यानुसार वरील संदर्भ क्र.१ ते ७ येथे नमुद केलेले शासन निर्णय अधिक्रमित करुन सुधारित प्रवेश नियम खालीलप्रमाणे लागु करण्यात येत आहे.:-

## सर्वसाधारण

(अ) वसतिगृह प्रवेशासाठी पात्रता

१) राज्यातील कोणत्याही भागातील विद्यार्थी / विद्यार्थीनींना कोणत्याही शासकीय वसतिगृहात प्रवेश दिला जाईल.

२) वसतिगृहात शासनामार्फत विशेष बाब म्हणून रिक्त जागांच्या ५ टक्के प्रवेश देण्याची विद्यमान तरतूद प्रवेश प्रक्रिया पारदर्शक व गुणवत्तेनुसार असावी यासाठी रद्द करण्यात येत आहे.

३) आर्थिक दृष्टया मागासलेल्या विद्यार्थ्यांना प्रवेश देण्याची तरतूद रद्द करण्यात येत आहे. कारण शालेय शिक्षण विभागाच्या शासन निर्णय क्र.एफईडी-१०९६/प्र.क्र.११७८/९६/सा.शि.-५, दिनांक १३ जून, १९९६ अन्वये आर्थिक दृष्टया मागासवर्गीयांची वार्षिक उत्पन्न मर्यादा रु.१५०००/- आहे. तर दारिद्रय रेषेखालील कुटुंबाची वार्षिक उत्पन्नाची मर्यादा रु.२००००/- आहे. वसतिगृह प्रवेशासाठी अर्जदाराचा दारिद्रय रेषेखालील स्तर (बी.पी.एल.स्टेटस) आधारभूत मानण्यात येईल. या परिच्छेदातील ब मध्ये नमूद केलेल्या प्रवर्गातील सर्व दारिद्रय रेषेखालील विद्यार्थ्यांची प्रवेशाची गरज भागल्यानंतर उर्वरित दारिद्रय रेषेवरील विद्यार्थ्यांना रु.२४,०००/- वार्षिक कमाल उत्पन्नाच्या मर्यादेच्या अधिन राहून त्यांचा अर्ज विचारात घेण्यात यावा. तथापि, दारिद्रय रेषेवरील विद्यार्थ्यांच्या प्रवेशाची संख्या कोणत्याही परिस्थितीत एकूण क्षमतेच्या २० टक्केपेक्षा जास्त असता कामा नये.

४) आदिम जमातीच्या विद्यार्थ्यांना वसतिगृह प्रवेशासाठी प्राधान्य राहील व कमीत कमी ५ टक्के जागा आदिम जमातीसाठी राखीव राहतील. आदिम जमातीच्या विद्यार्थ्यांचे अर्ज नसल्यास सर्वसाधारण अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना वरीलप्रमाणे प्रवेश देण्यात यावा.

५) शासनाने घोषित केलेल्या अतिदुर्गम संकुलातील गावांमधील विद्यार्थ्यांना प्रवेशासाठी वरीलप्रमाणे प्राधान्य देण्यात येईल.

६) प्रवेशासाठी पात्र ठरविलेल्या प्रत्येक प्रवर्गातील विद्यार्थ्यांना परिच्छेद १(ब) मध्ये विहित केलेल्या टक्केवारीच्या प्रमाणात फक्त गुणवत्तेनुसार प्रवेश दिला जाईल.

७) खालील विद्यार्थ्यांना प्रवेशपात्र धरण्यात येणार नाही :-

(१) महाविद्यालयातील शिक्षणक्रमाच्या मध्यंतरीच्या वर्गात शिकत असलेल्या विद्यार्थ्यांना नव्याने प्रवेश देता येणार नाही. तथापि, नियमानुसार जुन्या व नविन विद्यार्थ्यांना प्रवेश देऊन झाल्यानंतर देखील ज्या जाती व जमातीच्या रिक्त जागा शिल्लक राहतील त्या रिक्त जागांवर त्या त्या जाती जमातीच्या विद्यार्थ्यांना मध्यंतरीच्या वर्गात प्रवेश देता येईल.

(२) जर ते कोणत्याही नोकरीत असतील तर

(३) जर अर्धवेळ अभ्यासक्रम करीत असतील तर

(४) माध्यमिक शाळेत आठव्या वर्गाखाली शिकणारे विद्यार्थी

(५) वसतिगृहामध्ये गैरवर्तन करुन अशांतता निर्माण करणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रवेशास पात्र धरता येणार नाही.

(६) वसतिगृहाच्या ठिकाणापासून लांब अंतरावर राहणाऱ्या विद्यार्थ्यांना वसतिगृहाची सवलत उपलब्ध व्हावी म्हणून स्थानिक पालकांच्या मुलांना व वसतिगृहाच्या ठिकाणापासून ३ किलोमीटरच्या आतील गावाच्या मुलांना प्रवेश दिला जाणार नाही.

८) प्रथम वर्षी वसतिगृहात प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांपैकी उत्तीर्ण झालेल्या विद्यार्थ्यांना पुढील वर्षी आपोआपच प्रवेश मिळेल. त्यासाठी पुनश्च: अर्ज करण्याची आवश्यकता नाही. विद्यार्थी उत्तीर्ण वा अनुत्तीर्ण झाला तरी जुन्या विद्यार्थ्यांस प्रवेश देण्यात यावा. मात्र अनुत्तीर्ण विद्यार्थ्यास प्रवेशासाठी एकच संधी द्यावी.

८ अ) वसतिगृहातील सुविधा एका विद्यार्थ्यास फक्त एकाच व्यवसायिक अभ्यासक्रमासाठी उपलब्ध राहील, परंतु उच्च महाविद्यालयातील विद्यार्थ्यांसाठी टक्केवारीनुसार उपलब्ध होणा-या जागांवर नियमानुसार प्रवेश देऊन झाल्यांनतर जागा रिक्त राहात असल्यास दुस-या विषयाच्या अभ्यासक्रमासाठी प्रवेश देता येईल.

९) ज्या शहरातून वैद्यकीय/अभियांत्रिकी पदवी/पदविका अभ्यासक्रम आहेत, अशा ठिकाणच्या वसतिगृहात प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या प्रथम वर्षाच्या सर्व पात्र विद्यार्थ्यांना त्यांच्या जाती/जमातीनुसार ठरविलेल्या टक्केवारीपैकी उपलब्ध जागेवर प्रथम प्रवेश देण्यात येईल.

नंतर इतर महाविद्यालयीन शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांचा विचार होईल. प्रवेश प्रक्रियेनंतर वैद्यकीय/अभियांत्रिकी शास्त्रेचे विद्यार्थी प्रवेशासाठी आले तर वसतिगृहाची क्षमता उपलब्ध असेल. म्हणजे प्रति विद्यार्थी ४० चौ. फुट निवासी जागा उपलब्ध असेल तर अपवादात्मक परिस्थितीत व गरजेनुसार विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होऊ नये म्हणून कार्यवाही करणे गरजेचे असल्याची अपर आयुक्त यांनी खात्री करावी व रिक्त पदांच्या क्षमतेनुसार प्रवेश देण्याची कार्यवाही करण्याबाबत निर्णय घ्यावा. ज्या महाविद्यालयासाठी वसतिगृहांची सोय आहे, अशा ठिकाणी संबंधित विद्यार्थ्यांने तेथील वसतिगृहात प्रवेश घेतला नसल्याबाबतचे प्रमाणपत्र संबंधित प्राचार्यांकडून घेऊन ते सादर केल्यावरच प्रवेश अंतिम करावा.

१०) विद्यार्थ्यांची निवड सर्वस्वी त्यांच्या गुणवत्तेनुसार व त्यांच्यासाठी राखीव असलेल्या जागांच्या प्रमाणात केली जाईल. ज्या विद्यार्थ्यांना/विद्यार्थीनींना पुढील वर्षात एटीकेटीने प्रवेश दिला असेल, अशा विद्यार्थ्यांच्या प्रवेशाकरिता प्राधान्यक्रम खालीलप्रमाणे राहील :-

(१) वैद्यकीय/अभियांत्रिकी
(२) इतर तांत्रिक अभ्यासक्रम
(३) व्यावसायिक अभ्यासक्रम (आयटीआयसहित)
(४) गणित / विज्ञान शास्त्रेतील पदव्युत्तर पदवीचा अभ्यासक्रम
(५) गणित/विज्ञान शास्त्रेतील पदवीचा अभ्यासक्रम
(६) वाणिज्य
(७) कलाशास्त्रेतील इंग्रजी विषयाचा पदव्युत्तर/पदवीचा अभ्यासक्रम
(८) इतर पदव्युत्तर/पदवी अभ्यासक्रम

११) शासकीय वसतिगृहात रिक्त असलेल्या जागांसाठी प्रवेश देण्याचा अधिकार अपर आयुक्त, आदिवासी विकास यांना राहील.

(ब) <u>प्रवेश प्रक्रिया</u> :-

१) वसतिगृह प्रवेशाचा सुधारित विनामुल्य छापील फॉर्म गृहपाल, सहाय्यक प्रकल्प अधिकारी, प्रकल्प अधिकारी, अपर आयुक्त कार्यालयामध्ये तसेच आदिवासी सहकारी संस्था व आदिवासी विकास महामंडळाच्या प्रादेशिक व उप प्रादेशिक कार्यालयांमध्ये तसेच शासकीय तथा अनुदानीत आश्रमशाळा येथे उपलब्ध करुन द्यावेत. पुरेसे छापील अर्ज वरील ठिकाणी उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी अपर आयुक्त तसेच प्रकल्प अधिकारी यांची राहील. (प्रवेश अर्जाचा नमुना सोबत जोडला आहे)

२) रिक्त जागांची माहिती प्रवेशोच्छुक विद्यार्थ्यांना व्हावी यासाठी अपर आयुक्तांनी त्यांच्या अखत्यारित असलेल्या वसतिगृहांसाठी स्थानिक वर्तमानपत्रातून रिक्त जागांचा तपशील

प्रवर्गनिहाय व वसतिगृहनिहाय दर्शविणारी सूची जाहिरात द्यावी. गावाच्या चावड्या, वसतिगृहांचे ठिकाण व प्रकल्प कार्यालय येथे पत्रके लावून जाहिरात करावी. अर्जाचा नमूना जाहिरातीत प्रसिध्द करण्याची गरज नसुन त्यातील सर्व तपशिल जाहीरातीत नमुद असावा जेणेकरुन, विद्यार्थ्यांने जरी साध्या कागदावर अर्ज केला तरी तो स्वीकारला जाईल, यासाठी अर्जाचा नमूना सुलभ व सुटसुटीत करण्यात आला आहे. अर्जदाराने पंजीबध्द डाकेने पोचपावतीसह गृहपाल, प्रकल्प अधिकारी, अपर आयुक्त यांच्याकडे अर्ज पाठविल्यास तेदेखील स्वीकारले जातील. कार्यालयाच्या फलकावर अर्जाचा नमूना देखील लावावा.

३) माध्यमिक शाळेतील विद्यार्थ्यांसाठी शैक्षणिक सत्र सुरु होण्यापूर्वी प्रवेश प्रक्रिया पूर्ण करावी. महाविद्यालयीन विद्यार्थ्यांसाठी २० जून पूर्वी अथवा निकाल लागल्यापासून १५ दिवसांच्या कालावधीत प्रवेश अर्जाबाबत जाहिरात प्रसिध्द करण्यात यावी. अभ्यासक्रमाच्या निकालाच्या तारखा विचारात घेऊनच अपर आयुक्तांनी अर्ज स्वीकारण्याची अंतिम तारिख १ महिन्यानंतरची ग्राहय धरावी. गृहपाल, प्रकल्प अधिकारी व अपर आयुक्त कार्यालयाने अर्ज प्राप्त झाल्याबाबत संबंधितास पोच द्यावी.

४) वसतिगृहात नव्याने प्रवेश घेऊ इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांनी विहित तपशीलासह अर्ज सोबतप्रमाणे संबंधित प्राधिकाऱ्यांकडे जाहिरातीत नमूद केलेल्या मुदतीमध्ये निकाल लागल्याच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत सादर करणे आवश्यक राहील. प्रवेश दिलेल्या अर्जदारांची गुणवत्ता यादी गृहपाल, प्रकल्प अधिकारी व अपर आयुक्त कार्यालयाच्या फलकावर लावावी.

५) विद्यार्थ्यास कोणत्याही वसतिगृहात प्रवेश द्यावयाचा असला तरी त्यासाठी एकच प्रवेश अर्ज भरावयाचा असून विद्यार्थ्यांनी वसतिगृहांची नावे आपल्या पसंतीक्रमानुसार नमूद करण्याबाबत विद्यार्थ्यांना सूचित करण्यात यावे. विहित मुदतीनंतर प्राप्त झालेले अर्ज अथवा अपूर्ण माहिती असलेले अर्ज स्वीकारले जाणार नाहीत. याची स्पष्ट कल्पना विद्यार्थ्यांना द्यावी.

अर्जासोबत विद्यार्थ्यांनी पाठवावयाची कागदपत्रे :-

(१) विद्यार्थ्यांचा फोटो
(२) गुणपत्रिकेची प्रत
(३) जातीचे प्रमाणपत्र (उपलब्ध असल्यास)
(४) दारिद्रय रेषेखालील असल्याबाबत कार्ड

प्रवेश अंतिम करताना खालील दस्तऐवज अनिवार्य राहतील.

(१) शाळा सोडल्याचा दाखला
(२) कुटुंबप्रमुखाचे हमीपत्र

(३) जातीचे प्रमाणपत्र

(४) शाळेचे बोनाफाइड प्रमाणपत्र

(५) अभ्यासक्रमासाठी प्रवेश मिळालेल्या महाविद्यालयाच्या प्राचार्यांचे "संस्थेच्या वसतिगृहात प्रवेश घेतला नसल्याबाबतचे प्रमाणपत्र"

कुटुंबप्रमुखाच्या हमीपत्राचा नमूना व प्रवेश अंतिम करण्यासाठी आवश्यक असलेल्या दस्तऐवजांची यादी अर्जदारास पोच देतानाच द्यावी. (हमी पत्राचा नमुना सोबत जोडला आहे)

६) जाहिर केलेल्या प्रवेश कार्यक्रमानुसार प्राप्त झालेल्या प्रवेश अर्जांची नोंद संबंधित गृहपाल, प्रकल्प अधिकारी व अपर आयुक्त यांनी रजिस्टरमध्ये घ्यावी. त्यानंतर प्राप्त अर्जांची छाननी करुन ते अर्ज पुढील कार्यवाहीसाठी प्रकल्प अधिकारी यांनी संबंधित अपर आयुक्त यांचेकडे पाठवावेत. अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी वसतिगृहात रिक्त असलेल्या जागा विचारात घेऊन गुणवत्तेनुसार प्रवेशाची यादी तयार करावी. अपर आयुक्त यांनी जागा रिक्त राहिल्यास दुसरी व तिसरी गुणवत्ता यादी तयार करुन द्यावी.

७) गृहपालाकडे अर्ज प्राप्त झाल्यास ते त्यांनी अपर आयुक्त, आदिवासी विकास यांचेकडे पाठवावेत. प्रकल्प अधिकाऱ्यांनी प्राप्त अर्जांच्या नोंदी नोंदवहीत घेऊन गुणवत्तेनुसार तीन यादया तयार करुन प्रवेशाच्या पुढील कार्यवाहीसाठी अर्ज संस्कारित करुन संबंधित अपर आयुक्त यांचेकडे पाठवावेत. प्राप्त अर्जांची गुणवत्तेनुसार छाननी करुन अपर आयुक्त यांनी वसतिगृहातील रिक्त जागा पाहून त्यानुसार प्रवेश यादीस मंजूरी प्रदान करावी. गुणवत्तेनुसार तयार केलेल्या पहिल्या यादीतील प्रवेशार्थ्यांची मुदत संपल्यानंतर दुसऱ्या यादीतील विद्यार्थ्यांना प्रवेश घेण्यासाठी १० दिवसांची मुदत देण्यात यावी. दुसऱ्या यादीतील प्रवेशार्थ्यांची मुदत संपल्यानंतर जागा रिक्त राहिल्यास तिसऱ्या यादीतील विद्यार्थ्यांना प्रवेशासाठी विचार करण्यात यावा.

८) वसतिगृहात प्रवेश मिळालेल्या विद्यार्थ्यांना शाळा / महाविद्यालये सुरु होण्यापूर्वीच्या दोन दिवस अगोदर पासून ते त्यांची वार्षिक परिक्षा पूर्ण झाल्यानंतर पुढे तीन दिवसांपर्यंत वसतिगृहात राहता येईल. वार्षिक परिक्षा संपल्यानंतर शैक्षणिक संस्थेच्या प्रमुखांनी विवक्षितपणे शिफारस केल्यास वसतिगृहात राहणे आवश्यक असेल तर अपर आयुक्त यांची लेखी परवानगी आवश्यक राहील. त्यासाठी विद्यार्थ्यास कारणांसहित आवश्यक कागदपत्राच्या पुराव्याच्या आधारे एक महिना आधी प्रकल्प अधिकारी यांच्यामार्फत अपर आयुक्त यांच्याकडे अर्ज सादर करावा लागेल. या वाढीव कालावधीत विद्यार्थ्यांना भोजन अथवा निर्वाह भत्ता मिळणार नाही.

(क) वसतिगृहातील विद्यार्थ्यांच्या प्रवेशासाठी प्रवर्गनिहाय आरक्षण (टक्केवारी)

समाजकल्याण विभागाकडून आदिवासी विकास विभागाकडे वर्ग झालेल्या सर्वच वसतिगृहांसाठी प्रवेशाची टक्केवारी सुधारणा केल्यानुसार खालीलप्रमाणे राहील :-

| | | |
|---|---|---|
| (१) | अनुसूचित जमाती | ८१ टक्के |
| (२) | अनुसूचित जाती | १० टक्के |
| (३) | विमुक्त जाती व भटक्या जमाती | ४ टक्के |
| (४) | विशेष मागास प्रवर्ग | २ टक्के |
| (५) | अंध व अपंग | ३ टक्के |

टिप :- १) आदिम जमातींसाठी राखीव असलेल्या ५ टक्के जागा वरील ८१ टक्क्यांमध्ये अतर्भुत आहेत.

२) प्रत्येक वसतिगृहात २% जागा अनाथ मुलामुलींसाठी राखीव राहतील. यामध्ये शासकीय प्रमाणित शाळेतील मुलांमुलींसाठी प्रवेशाकरिता अग्रक्रम राहील. वसतिगृहातील प्रवेश क्षमतेपैकी २% जागा वगळुन उर्वरित जागांचे वरीलप्रमाणे इतर प्रवर्गामध्ये वाटप करण्यात येईल.

३) अपंगासाठी आरक्षित असलेल्या ३% जागांवर प्रवेश देताना अंध विद्यार्थ्यांना प्राधान्य देण्यात यावेत. इतरांसाठी त्यांच्या अपंगत्वाचे गांभिर्य विचारात घेऊन त्या अग्रक्रमाने प्रवेश देण्यात यावा.

वरील टक्केवारीनुसार प्रवेश देतेवेळी खालील अटी कटाक्षाने पाळण्यात याव्यात.

(१) आदिवासी विकास विभाग स्वतंत्र झाल्यानंतर जी वसतिगृहे शासनाने केवळ शासकीय आदिवासी आश्रमशाळांमधून इयत्ता ७ वी पास होणाऱ्या विद्यार्थ्यांना माध्यमिक शाळांतून शिक्षण घेण्याची संधी मिळण्यासाठी आदिवासी उपयोजना क्षेत्रात तालुक्याच्या व जिल्हयाच्या ठिकाणी उघडली आहेत, अशा सन १९८२-८३ नंतरच्या वसतिगृहांमध्ये १०० टक्के आदिवासी मुलांना प्रवेश दिला जाईल. मागासवर्गीयांच्या इतर प्रवर्गातील विद्यार्थ्यांना अशा वसतिगृहांमध्ये प्रवेश देता येणार नाही.

• (२) अनुसूचित जाती/जमाती यापैकी कोणत्याही एका जाती/जमातीच्या विद्यार्थ्यांना एका वसतिगृहात ३० टक्क्यापेक्षा जास्त जागा देऊ नये. त्याच्यात बदल करावयाचा निर्णय अपर आयुक्त, आदिवासी विकास यांनी कारणे लेखी नोंद करुन स्थानिक परिस्थितीनुसार घ्यावा.

(३) अंध व अपंग विद्यार्थ्यांना प्रवेश देताना त्यामध्ये देखील आदिवासी विद्यार्थ्यांना प्राधान्य देण्यात यावे. अंध व अपंग आदिवासी विद्यार्थी उपलब्ध नसल्यास अनुक्रमे अनुसूचित जाती, विमुक्त जाती व भटक्या जमाती, विशेष मागास प्रवर्गातील अंध व अपंग विद्यार्थ्यांचा प्रवेशासाठी विचार करण्यात यावा.

(४) सर्व प्रयत्न करुनदेखील आदिवासी विद्यार्थ्यांच्या जागा रिक्त राहून क्षमता उपलब्ध असल्यास त्या जागा क्रमाने अनुसूचित जाती, विमुक्त जाती व भटक्या जमाती आणि विशेष मागास प्रवर्गातील विद्यार्थ्यांना अपर आयुक्त, आदिवासी विकास हे त्या शैक्षणिक वर्षापुरत्याच देतील. मात्र अपर आयुक्त, आदिवासी विकास यांच्या अशा परवानगीनुसार अन्य गटातील जाती/जमातीच्या ज्या विद्यार्थ्यांना रिक्त असलेल्या आदिवासी विद्यार्थ्यांच्या जागांवर प्रवेश दिला त्याच्या पुढील वर्षी सदर विद्यार्थी ज्या गटात / जातीत मोडत असेल त्या गटातील / जातीतील प्रवेश दिला आहे, असे नंतरच्या शैक्षणिक वर्षात समजावे. मात्र अशा विद्यार्थ्यांना त्या प्रवर्गाची जागा नंतरच्या शैक्षणिक वर्षात आपोआप मिळणार नाही. त्यासाठी त्यांना पुन्हा अर्ज करावा लागेल.

(५) वसतिगृहात प्रवेश दिल्यानंतर एकाच वयोगटातील मुलांना निवासासाठी स्वतंत्र खोल्या उपलब्ध करुन द्याव्यात. एका ठिकाणी राहणाऱ्या मुलांच्या वयामध्ये जादा तफावत असू नये.

(ड) जिल्हा व तालुका आणि विभागीय स्तरावरील वसतिगृहातील प्रवेशाचे प्रमाण :-

शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग क्र.१२९७/प्र.क्र.१/का.१२, दिनांक २४ फेब्रुवारी, २००० मध्ये माध्यमिक, कनिष्ट महाविद्यालयीन, उच्च महाविद्यालयीन शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांच्या वसतिगृह प्रवेशासाठी असलेली आरक्षणाची विहित टक्केवारी तशीच राहील. त्याचा तपशील पुढीलप्रमाणे

अ) जिल्हा व तालुकास्तर वसतिगृहे

१. कनिष्ठ महाविद्यालयात शिक्षण घेणारे विद्यार्थी — २५ टक्के
२. उच्च महाविद्यालयात शिक्षण घेणारे विद्यार्थी — ६५ टक्के
३. माध्यमिक शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी (इयत्ता ८ वी ते १० वी) — १० टक्के

ब) विभागीय स्तरावरील वसतिगृहे

१. कनिष्ठ महाविद्यालयात शिक्षण घेणारे विद्यार्थी (इयत्ता ११ वी व १२ वी) — २० टक्के
२. उच्च महाविद्यालयात शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी — ८० टक्के

अपवादात्मक परिस्थितीत तालुका स्तरावरील एखाद्या वसतिगृहात पुरेसे महाविद्यालयीन आदिवासी विद्यार्थी उपलब्ध न झाल्यास माध्यमिक शिक्षण घेणाऱ्या आदिवासी विद्यार्थ्यांना वसतिगृहात प्रवेश देण्याचे अधिकार अपर आयुक्त, आदिवासी विकास यांना राहतील.

(इ) वसतिगृहातील प्रवेश क्षमता :- वर्गीकरण

कोणत्याही वसतिगृहास मंजूर असलेली विद्यार्थी संख्या पूर्ण वापरली न गेल्यास आवश्यक तेथे प्रकल्प स्तरावरील वसतिगृहातील प्रवेश क्षमता अदलाबदलीने वापरण्याचे अधिकार प्रकल्प अधिकारी यांना तसेच जिल्हा स्तरावरील वसतिगृहातील प्रवेश क्षमता आवश्यकतेनुसार अदलाबदलीने वापरण्याचे अधिकार अपर आयुक्त, आदिवासी विकास यांना तर एका विभागातील प्रवेश क्षमता अन्य विभागाकडे वर्ग करणे व आवश्यकतेनुसार कर्मचारी वृंद वर्ग करण्याचे अधिकार आयुक्त, आदिवासी विकास यांना राहतील.

वरील नियम व शर्ती आदिवासी विकास विभागामार्फत चालविल्या जाणाऱ्या मुलामुलींच्या सर्व शासकीय वसतिगृहांना लागू राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(एम. रमेशकुमार)
प्रधान सचिव

प्रति,
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/अमरावती/नागपूर
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य, आदिवासी विकास महामंडळ, नाशिक.
सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
मा.मंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव
मा.राज्यमंत्री (आ.वि.) यांचे खाजगी सचिव
सर्व कार्यासने, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती, का.१२, आदिवासी विकास विभाग.

(विनामुल्य)

आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक संचलित
शासकीय वसतिगृह प्रवेश आवेदन पत्र २००४-२००५

| | | | |
|---|---|---|---|
| अनुसूचित जाती | ) | | फोटो |
| अनूसूचित जमात | ) | (नवीन प्रवेशार्थी) | |
| विमुक्त जाती व भटक्या जमाती | ) | | |
| विशेष मागास प्रवर्ग | ) | | |

प्रति,
आपर आयंक्त,
आदिवासी विकास,

महोदय/महोदया,

मी आपल्या अखत्यारितील वसतिगृहात प्रवेश मिळ्वू इच्छितो/इच्छिते. प्रवेश पत्रिकेत दिलेला तपशील माझ्या माहितीनुसार दिलेला आहे. मला वसतिगृहात प्रवेश मिळाल्यानंतर मी शासकीय वसतिगृह नियमावलीचे कसोशीने पालन करीन, असे आश्वासन देतो/देते. प्रवेश प्रत्रिकेत दिलेली माहिती चुकीची असल्यास अगर गैरशिस्त वागणूक आढळून आलयास मला केव्हाही वससितगृहातून काढून टाकण्यात येईल. याची मला जाणीव आहे.

स्थान-----------------------------  आपला/आपली विश्वासु,

दिनांक--------------------------  अर्जदार विद्यार्थी/विद्यार्थीनीची सही

अर्जदाराने भरावयाची माहिती

१. पूर्ण नांव (प्रथम आडनाव ) ------------------------------------------------

२. सध्याचा पूर्ण पत्ता.

३. कायमचा पत्ता.

४. जन्मस्थळ ठिकाण-----------तालुका---------जिल्हा-------

A:C R 52 -04 .lwp

५. जन्मदिनांक

६. धर्म आणि जात.

७. यापूर्वी शासकीय वसतिगृहात राहत
असल्यास वसतिगृहाचे नांव.

८. अशा वसतिगृहात राहण्याचा कालावधी.

९. पूर्वी राहत असलेले वसतिगृह सोडण्याचे कारण.

१०. नेहमीच्या अभ्यासक्रमाव्यतिरिक्त दिलेल्या परीक्षा

११. चालू वर्षी अर्जदारास कोणत्या इयत्तेत प्रवेश पाहिजे.

१२. मागील वर्षातील वार्षिक परिक्षेत मिळालेल्या गुणांची टक्केवारी
एकूण मिळालेले गुण---------पैकी------------ व टक्केवारी-------
परीक्षेचा निकाल------------नापास/पास
(गुणपत्रिकेची प्रत अर्जासोबत जोडावी)

१३. प्रवेशासाठी वसतिगृहांचा पसंतीक्रम.

---

(कार्यालयीन कामकाजासाठी)

१. अर्ज प्राप्त झाल्याचा दिनांक
२. अर्जासोबत सर्व आवश्यक ती कागदपत्रे.
जोडलेले आहेत काय? अर्ज परिपूर्ण आहे काय
३. अर्ज निवड समितीपुढे ठेवल्याचा दिनांक
४. अर्जदार विद्यार्थ्यास निवड समितीने प्रवेश दिला किंवा नाही होय/नाही

प्रकल्प अधिकारी,
एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प

५. विद्यार्थ्यास वसतिगृहात प्रवेश दिल्याचा दिनांक

## कुटुंबप्रमुखाने द्यावयाचे हमीपत्र

मी----------------------------------------राहणार---------, ता. ---------, जि.--------- हमी देतो की, अर्जदार विद्यार्थ्यास वसतिगृहात प्रवेश मिळाल्यास वसतिगृहामार्फत मिळणाऱ्या सर्व वस्तुसाठी मी जबाबदार राहीन. विद्यार्थ्याकडून सामानाची मोडतोड झाल्यास किंवा सामान हरविल्यास त्या वस्तुंची योग्य किंमतीनुसार मी भरपाई करीन. ही किंमत वसतिगृहाच्या अधिकाऱ्यांकडून ठरविली जाईल. वस्तुंची योग्य किंमतीनुसार मी भरपाई करीन. ही किंमत वसतिगृहाच्या अधिकाऱ्यांकडून ठरविली जाईल. विद्यार्थ्याने गैरवर्तन केले किंवा वसतिगृहाच्या नियमांचे उल्लंघन केले तर त्यास वसतिगृहातून नोटीस न देता काढून टाकण्यास माझी हरकत नाही. माझे वार्षिक उत्पन्न सर्व मार्गानी मिळून रुपये -------------(अक्षरी रुपये--------------------------) आहे.

स्थळ

पालकाची स्वाक्षरी

दिनांक :

साक्षीदारांची नांवे व पत्ता

साक्षीदारांच्या सहया

(१)

(२)

A:C R 32 -04 .lwp